पदोन्नती

कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अधिकारी पदावर पदोन्नती व पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन आदेश, क्रमांकः पीओजी-२०२०/प्र.क्र.२३/सेवा-२
मंत्रालय, मुंबई
दिनांक: १९.०६.२०२०

## शासन आदेश

सन २०१८-२०१९ च्या निवडसूचीतील खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर या आदेशान्वये तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर संबंधितांची नियुक्ती त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कनिष्ठ अभियंता यांचे नांव व जात प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला विभागीय संवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १. | श्री.गुरूसिध्द शंकरराव नाईक, अ.जा. | खुला | पुणे | सा.बां.उप विभाग, मंगळवेढा, जि.सोलापूर |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबबात विधी व न्याय विभागाने खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिलेले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दिनांक २५.५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार

आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सामान्य प्रशासन विभागाने दि. २९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या आहेत.

त्यानुसार श्री.गुरूसिध्द शंकरराव नाईक यांना देण्यात आलेली पदोन्नती ही मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात करण्यात येत आहेत.

३. सदर तदर्थ पदोन्नती ११ महिने अथवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होतील, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहील. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार प्राप्त झाल्यास, तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना पदावनत करण्यात येईल. सदर तदर्थ पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपात असून सदर पदावर श्री.गुरूसिध्द शंकरराव नाईक यांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही.

४. श्री.गुरूसिध्द शंकरराव नाईक यांना देण्यात आलेली पदोन्नती ही निव्वळ तात्पूरत्या स्वरूपाची असून, सदर पदोन्नतीच्या अनुषंगाने त्यांना उप विभागीय अधिकारी या संवर्गात जेष्ठता मिळणार नाही. तसेच आवश्यकता भासल्यास अशी तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अभियंत्यांना पदावनत करण्यात येईल. सदर अट मान्य असल्याबाबत सदर अभियंत्यांकडून पदोन्नतीच्या पदावर रूजू करून घेण्यापूर्वी लेखी स्वरूपात संमती पत्र घेण्यात यावे.

५. श्री.गुरूसिध्द शंकरराव नाईक यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित /न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नत्या देण्यात येत आहेत. तथापि, या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/ न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल असल्यास त्यांच्याबाबतीत हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

६. श्री.गुरूसिध्द शंकरराव नाईक, कनिष्ठ अभियंता ( स्थापत्य) यांना देण्यात येणारी पदोन्नती ही, संबंधितांच्या वयाचे ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयातील तरतूदींच्या अधिन राहील.

७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,पुणे /सा.बां.मंडळ, पुणे यांना अशी विनंती करण्यात येते की, श्री.नाईक, कनिष्ठ अभियंता ( स्थापत्य) यांना पदोन्नतीचे व सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तात्काळ कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१९१२४२१२६०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Patil Swati Sachin

Digitally signed by Patil Swati Sachin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, serialNumber=41a9218232bbaea65861213d86d108ea7c48905da5f33dba9c8f6662cb8f9e18, cn=Patil Swati Sachin
Date: 2020.06.19 13:00:41 +05'30'

**(स्वा.स.पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्राने.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
४. श्री.गुरूसिध्द शंकरराव नाईक, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना संबंधित मुख्य अभियंता सा.बां.प्रादेशिक विभाग,पुणे यांच्यामार्फत.
५. अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे
६. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन सेवा-१,सेवा-३,आस्थापना- १/३, सेवा-६,रोख शाखा, संगणक कक्ष, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.